आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१५-१६ चे योजनानिहाय अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या **" मार्ग व पुल यावरील भांडवली खर्च "** या उपशिर्षाखालील सन २०१५-१६ निधी वितरीत **करण्याबाबत. (५०५४ ५११७ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.२६/कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: -०६ नोव्हेंबर, २०१५.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५.
२) या विभागाची नस्ती क्र.रस्ते- २०१५/ प्र.क्र.६८/ का-०५.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.आविवि-२०१५/ प्र.क्र.६८/का-०५, दि. ०६-०११-२०१५.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-६, ५०५४ मार्ग व पुल यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०४- जिल्हा व इतर मार्ग, ७९६- जनजाती क्षेत्रउपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०७) जिल्हा व इतर मार्ग ( राज्यस्तर योजना), (५०५४ ५११७ ) ५३- मोठी बांधकामे, या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षात रु. २५५००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे.

वित्त विभागाच्या वाचा क्र. १ येथील परिपत्रकानुसार योजनांतर्गत अर्थसंकल्पित तरतूदी वितरित करण्यास प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान केलेले आहेत. वाचा क्र. २ मधील नस्तीवर सन २०१५-१६ या वर्षात या प्रयोजनार्थ अर्थसंकल्पित तरतूदी वितरित करण्यास शासन स्तरावर मंजूरी घेतलेली आहे. यामुळे (०१) (०७) जिल्हा व इतर मार्ग ( राज्यस्तर योजना), (५०५४ ५११७ ) ५३- मोठी बांधकामे, या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित **रु. २५५००.०० लक्ष निधीपैकी ५० % च्या मर्यादेत रु. १२७५०.०० लक्ष ( रुपये एकशे सत्तावीस कोटी पन्नास लक्ष फक्त )** निधी खालील तालिकेत दर्शविल्यानुसार नियंत्रक अधिकारी निहाय अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. **सदर वितरीत केलेला निधी नियंत्रक अधिकारी यांनी अर्थसंकल्पिय अंदाज परिशिष्ट-ड, २०१५-१६ यामध्ये दर्शविल्याप्रमाणे प्रकल्पनिहाय / कामनिहाय अर्थसंकल्पित तरतूदीच्या ५० % इतक्या मर्यादेत व प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्याची दक्षता घ्यावी.**

( रुपये लक्ष )

| अ. क्र. | जिल्हा | सन २०१५-१६ अर्थसंकल्पिय निधी | प्रस्तावित वितरण ५० % | नियंत्रक अधिकारी. |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | १९२३.४४ | ९६१.७२ | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे. |
| २ | पालघर | ६८७७.६८ | ३४३८.८४ | |
| ३ | धुळे | ९६१.९२ | ४८०.९६ | अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | नंदूरबार | ४०५१.०९ | २०२५.५५ | |
| ५ | नाशिक | ३५९६.६३ | १७९८.३२ | अधीक्षक अभियंता , सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक |
| ६ | नागपूर | ११०६.९४ | ५५३.४७ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर. |
| ७ | गोंदिया | ६१२.२५ | ३०६.१३ | |
| ८ | गडचिरोली | १५७९.१३ | ७८९.५६ | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,गडचिरोली. |
| ९ | चंद्रपूर | ७९३.५० | ३९६.७५ | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ ,चंद्रपूर. |
| १० | वर्धा | २४०.०० | १२०.०० | |
| ११ | नांदेड | ८८१.७५ | ४४०.८७ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड |
| १२ | यवतमाळ | ६७२.१५ | ३३६.०७ | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ |
| १३ | जळगांव | ४५६.५० | २२८.२५ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव. |
| १४ | अहमदनगर | ४४६.६० | २२३.३० | अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ , अहमदनगर. |
| १५ | अकोला | ११.०० | ५.५० | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ ,अकोला. |
| १६ | बुलढाणा | ४२५.०० | २१२.५० | |
| १७ | रायगड | ४३४.०० | २१७.०० | अधीक्षक अभियंता ,सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड. |
| १८ | पुणे | ४३०.४२ | २१५.२१ | |
| **एकुण:-** | | **२५५००.००** | **१२७५०.००** | |

२. नियंत्रण अधिकारी यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. **आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी**. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५.   सदर शासनादेश **वाचा** येथील क्रमांक १ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०६१५३१५१८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46649f0512aae1ea70b45531f8da4721c9c533d2067535914c930bf1b55d3262, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.11.06 16:47:28 +05'30'

**मनोजकुमार महाले**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. अवर सचिव, कार्यासन-०५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.